**सन २०१०-२०११ या शैक्षणिक वर्षापासून माध्यमिक स्तरावरील पूर्वव्यावसायिक अभ्यासक्रमाच्या नवीन/ अधिकच्या तुकडयांना कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर सुरू करण्यांस मान्यता देणेबाबत....**

महाराष्ट्र शासन
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक व्हीओसी २०१०/५९९/प्र.क्र.१८१/व्यशि-४,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ४ ऑगस्ट, २०१०

**संदर्भ** : १. प्रभारी संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक ७/अशातांवि/२०१०/४६ दिनांक १३.७.२०१०

**प्रस्तावना :-** केंद्र शासनाच्या नवीन शैक्षणिक धोरणानुसार माध्यमिक स्तरावर व्यवसाय शिक्षणाची जोड देऊन विद्यार्थ्यांमध्ये व्यवसाय शिक्षणाची आवड निर्माण करणे व प्राथमिक कौशल्य विकसित करण्याच्या दृष्टीने खालील तीन बहुकौशल्ययुक्त अभ्यासक्रम १९९६-९७ पासून सुरु करण्यात आले. सदर अभ्यासक्रम राज्यामध्ये १५६ शासकीय २२५ अशासकीय अनुदानित आणि ३६० अशासकीय विनाअनुदानित संस्थामध्ये राबविण्यात येत आहेत.

१. V-1 मूलभूत तंत्रज्ञानाची ओळख (Introduction to Basic Technology-IBT),
२. V-2 अभियांत्रिकी तंत्रज्ञानाची मूलभूत तत्त्वे (Elements of Mechanical Engineering-EME)
३. V-3 विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानाची मूलभूत तत्त्वे (Elements of Electrical and Electronics Techonology-EEET)

या अभ्यासक्रमांची वाढती मागणी लक्षात घेऊन शैक्षणिक वर्ष २०१०-११ पासून माध्यमिक स्तरावरील पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या अधिकच्या/नवीन तुकड्या **कायम स्वरुपी विनाअनुदानित तत्वावर** सुरु करण्यासाठी व्यवसाय शिक्षण संचालनालयाकडून जाहीरात विज्ञापित करण्यात आली होती. त्यानुसार १५ संस्थांकडून अभ्यासक्रम सुरु करण्याचे प्रस्ताव संचालनालयास प्राप्त झाले होते. सदर प्रस्तावांची छाननी केल्यानंतर संचालनालयाने ९ संस्थांमध्ये ९ अधिकच्या /नवीन तुकड्या सुरु करण्याची शिफारस शासनास केली आहे. या ९ संस्थांमध्ये माध्यमिक स्तरावरील पूर्वव्यवसायिक अभ्यासक्रम सुरु करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** माध्यमिक स्तरावरील पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रमाच्या **९** अशासकीय संस्थांमध्ये **९** अधिकच्या/नविन तुकडया (सोबतच्या प्रपत्रात दर्शविल्याप्रमाणे) **कायमस्वरूपी विनाअनुदानित तत्वावर** शैक्षणिक वर्ष २०१०-११ पासून सुरू करण्यास खालील अटीं व शर्तीच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यांत येत आहे. याचा लाभ माध्यमिक स्तरावरील ५४० विद्यार्थ्यांना होईल.

**अटी व शर्ती**

१. संबंधित संस्थेस माध्यमिक शाळा संहितेमध्ये नमूद केलेल्या सर्व अटी व शर्तीची पूर्तता करणे बंधनकारक राहील.
२. मान्य अभ्यासक्रमांच्या नविन/अधिकच्या तुकडया सुरू करण्यांस **कायमस्वरूपी विनाअनुदानित तत्वावर** मान्यता दिली असली तरीही, भविष्यात कोणत्याही प्रकारचे अनुदान अथवा आर्थिक मदत देण्यांत येणार नाही.
३. मान्य अभ्यासक्रम राबविणा-या संस्थांना शासन/संचालनालय/संचालनालयाच्या अखत्यारीतील संबंधित कार्यालये यांच्या कडून वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या आदेशांचे पालन करणे बंधनकारक राहील.
४. शासनाने वेळोवेळी निश्चित केलेले शिक्षण शुल्क विद्यार्थ्यांकडून आकारणे संस्थेस बंधनकारक राहील.
५. **"कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर मान्यता मिळालेले माध्यमिक स्तरावरील पूर्व व्यावसायिक अभ्यासक्रम "** असा सूचना फलक संस्थांनी दर्शनी भागावर लावणे बंधनकारक राहील. सूचना फलकावर अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांची संख्या व मंजूर प्रवेश क्षमता याचा उल्लेख करण्यात यावा.

६. संबंधित संस्थेने मंजूर अभ्यासक्रमासाठी मानकानुसार आवश्यक असलेल्या सर्व पायाभूत सुविधा उपलब्ध करुन देऊन तात्काळ अभ्यासक्रम सुरु करावेत.

७. सदर अभ्यासक्रमांना कायमस्वरूपी विनाअनुदान तत्वावर मान्यता देण्यांत आल्यामुळे या अभ्यासक्रमाकरीता संस्थेने नियुक्त केलेल्या सर्व कर्मचारी वर्गाची सेवा/वेतन व तदनुषंगिक बाबींची जबाबदारी सर्वस्वी संबंधित संस्थेची राहील. याबाबत शासन कोणतीही जबाबदारी घेणार नाही.

८. मंजूर अभ्यासक्रमांकरीता आवश्यक कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या, त्यांची किमान शैक्षणिक अर्हता, अनुभव याबाबत संस्थेने महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मधील तरतुदींनुसार तसेच शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशानुसार कार्यवाही करण्यांत यावी.

९. भविष्यात सदरचे अभ्यासक्रम बंद करण्याबाबत, किंवा त्यात काही बदल करण्याबाबत शासनाने निर्णय घेतल्यास तो विनाअट, विनाविलंब संस्थेने अंमलात आणणे आवश्यक राहील.

१०. अभ्यासक्रमांच्या मंजूर तुकडयांमधील प्रवेशाकरीता, शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले सामाजिक/समांतर आरक्षण व इतर नियमांचे संस्थेने काटेकोरपणे पालन करावे व गुणानुक्रमे प्रवेश देण्यांत यावेत.

११. अभ्यासक्रमांना मंजूरी मिळाल्यानंतर सदर अभ्यासक्रम संस्थेत सुरू केल्याबाबतची माहिती संस्थेने महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक परिक्षा मंडळास तात्काळ द्यावी त्याबाबतची अनुषंगिक कार्यवाही करावी.

१२. मान्यता देण्यांत आलेल्या अभ्यासक्रमाच्या अधिकच्या/नविन तुकडयांची प्रवेश क्षमता प्रती तुकडी ६० असून, शैक्षणिक वर्ष २०१०-२०११ मध्ये मंजूर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास अशा तुकडया सुरू ठेवण्याकरीता संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिका-यांची परवानगी घेणे आवश्यक राहील. त्याचप्रमाणे सलग तीन शैक्षणिक वर्षांमध्ये मंजूर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी प्रवेश झाल्यास सदर अभ्यासक्रमाची तुकडी बंद करण्याची कार्यवाही करण्यांत येईल.

१३. शैक्षणिक गुणवत्ता वाढविण्यासाठी उपरोक्त अटी व शर्तीमध्ये बदल करण्याचे किंवा नविन अटी व शर्ती अंर्तभूत करण्याचे अधिकार शासनाचे राहतील.

हा शासन निर्णय राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असुन त्याचा संगणक सांकेतांक क्र. **२०१००८०४२०३२४७००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

(शोभा वि. पत्की)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत :-

१) प्र. संचालक (व्यवसाय शिक्षण) व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई -१
२) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक, (शालेय शिक्षण विभाग), मुंबई/पुणे/नाशिक/कोल्हापूर/लातूर/नागपूर/अमरावती/औरंगाबाद (यांचेकडे व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनायामार्फत)
३) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण प्रादेशिक कार्यालय, मुंबई /नाशिक/ पुणे/अमरावती/नागपुर (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया मार्फत.)
४) संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी (संचालनालयामार्फत)
५) संबंधित अशासकीय संस्था (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालया मार्फत. त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सर्व संबंधित संस्थांना अवगत करावे.)
६) मा. मंत्री (उ व तंशि) यांचे खाजगी सचिव
७) मा. राज्यमंत्री (उ व तंशि) यांचे खाजगी सचिव
८) निवड नस्ती (व्यशि-४)

## शैक्षणिक वर्ष २०१०-२०११ पासून मान्यता देण्यात येणा-या पूर्व व्यवसाय अभ्यासक्रमाचे नांव व तुकडयाची संख्या

| विभाग | जिल्हा | अ.क्र | संस्थेचे नांव व पत्ता | शैक्षणिक वर्ष २०१०-११ पासून देण्यात पूर्व व्यवसायीक व्यवसा अभ्यासक्रम नांव व तुकडयांची संख्या | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | अभ्यासक्रमाचे नांव | मंजूर तुकडयाची संख्या प्रती तुकडी (प्रवेश क्षमता ६० विद्यार्थी) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| मुंबई | सिंधुदुर्ग | १ | वाळवा तालुका शिक्षण संस्था इस्लामपूर, संचलित वि.स.खांडेकर विद्यालय, सावंतवाडी, ता.सावंतवाडी जि.सिंधुदुर्ग - ४१६५१०. | यंत्र अभियांत्रिकीची मूलभूत तत्वे (व्ही-२) | १ |
| | रत्नागिरी | २ | परशुराम एज्युकेशन सोसायटीचे युनायटेड इंग्लिश स्कुल, चिपळूण, ता.चिपळूण, जि.रत्नागिरी -४१५ ६०५ | विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानाची मूलभूत तत्वे (व्ही-३) | १ |
| पुणे | सांगली | ३ | वाळवा तालुका शिक्षण संस्था संचलित येलूर हायस्कूल येलूर, ता.वाळवा, जि.सांगली. | यंत्र अभियांत्रिकीची मूलभूत तत्वे (व्ही-२) | १ |
| नाशिक | नाशिक | ४ | जगदंबा एज्यु.सोसायटी येवला संचालत संतोष श्रमिक माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, बाभुळगांव, पो.भाटगांव, ता.येवला, जि.नाशिक | विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानाची मूलभूत तत्वे (व्ही-३) | १ |
| | जळगांव | ५ | रुरल एज्युकेशन सोसायटी संचलित महात्मा गांधी विद्यालय, भादली बुद्रुक, ता. जळगांव, जि.जळगांव - ४२५ १०२ | यंत्र अभियांत्रिकीची मूलभूत तत्वे (व्ही-२) | १ |
| अमरावती | बुलढाणा | ६ | जगदंबा शिक्षण संस्था व्दारा संचलित स्व.पंजाबराव जाधव आदिवासी माध्यमिक विद्यालय, टिटवी, ता.लोणार, जि.बुलढाणा | विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानाची मूलभूत तत्वे (व्ही-३) | १ |
| | | ७ | समता एज्युकेशन सोसायटी मर्यादीत गांगलगाव, ता.देऊळगांवराजा, जि.बुलढाणा व्दारा संचलीत श्री.परमानंद तांत्रिक विद्यालय, काटोडा, ता.चिखली, जि.बुलढाणा | यंत्र अभियांत्रिकीची मूलभूत तत्वे (व्ही-२) | १ |

| विभाग | जिल्हा | अ.क्र | संस्थेचे नांव व पत्ता | शैक्षणिक वर्ष २०१०-११ पासून देण्यात पूर्व व्यवसायीक व्यवसा अभ्यासक्रम नांव व तुकडयांची संख्या | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | अभ्यासक्रमाचे नांव | मंजूर तुकडयाची संख्या प्रती तुकडी (प्रवेश क्षमता ६० विद्यार्थी) |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| अमरावती | बुलढाणा | ८ | समता एज्युकेशन सोसायटी मर्यादीत गांगलगाव, ता.देऊळगांवराजा, जि.बुलढाणा व्दारा संचलीत लालबहादूर शास्त्री तांत्रिक विद्यालय, हिवरखेड, ता.खामगांव, जि.बुलढाणा | मुलभूत तंत्रज्ञानाची ओळख (व्ही-१) | १ |
| नागपूर | चंद्रपूर | ९ | ग्रामिण विकास शिक्षण प्रसारक मंडळ,भद्रावती संचलित स्व.दादाजी गुडावार तंत्र माध्यमिक विद्यालय, बंगाली कॅम्प रोड, विंजासन, भद्रावती, जि.चंद्रपूर | विद्युत आणि इलेक्ट्रॉनिक्स तंत्रज्ञानाची मूलभूत तत्वे (व्ही-३) | १ |
| | एकूण | | | | ९ |

श्री. वि प [illegible]